**जलसंपदा प्रकल्पांना प्रशासकीय मान्यता व सुधारित प्रशासकीय मान्यता प्रदान करण्यापुर्वी महाराष्ट्र जलसंपत्ती नियमन प्राधिकरणाची मान्यता घेण्यासंदर्भात मागदर्शक सूचना...**

# महाराष्ट्र शासन

## जलसंपदा विभाग

**शासन परिपत्रक क्र.मजनिप्रा-२०२०/०१/(०१/२०), जसं(आस्था)**

मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई-४००० ०३२.
दिनांक ११ ऑगस्ट, २०२०

<u>वाचा:</u>- १) शासनाचे शुध्दीपत्रक क्र.WRD-Restructuring/२००९/(१६/०९)/WR(Estt), दि.१९/११/२०१०.
२) शासनाचे पत्र क्र.मजनिप्रा-२०११/(२४/२०११)जसं(आस्था), दि.२९/०४/२०११.
३) शासन परिपत्रक क्र.मजनिप्रा-२०११/(२४/२०११)जसं(आस्था), दि.२१/०९/२०११.
४) शासन निर्णय क्र.संकीर्ण-२०१५/(४२५/२०१५)/मध्यम प्रकल्प, दि.१६/११/२०१६.

जलसंपदा प्रकल्पांना प्रशासकीय मान्यता आणि सुधारीत प्रशासकीय मान्यता प्रदान करण्यासाठी संदर्भ क्र.१ नुसार स्थापन करण्यात आलेल्या राज्यस्तरीय तांत्रिक सल्लागार समितीकडे (State Level Technical Advisory Committee) तसेच महाराष्ट्र जलसंपत्ती नियमन प्राधिकरणाकडे (मजनिप्रा) सादर करण्यात येत असलेल्या प्रस्तावांच्या अनुषंगाने संदर्भिय शासन पत्र क्र.२ अन्वये कार्यपध्दती नमूद करण्यात आली होती. सदर कार्यपध्दतीत सुस्पष्टता आणण्यासाठी महाराष्ट्र जलसंपत्ती नियमन प्राधिकरण अधिनियम, २००५ मधील कलम ११(च) मधील तरतूदींच्या अनुषंगाने दि.०१/०४/२०११ नंतर प्राप्त झालेल्या प्रशासकीय मान्यतेच्या प्रस्तावाबाबत तसेच सुधारीत प्रशासकीय मान्यतेच्या प्रस्तावाबाबत संदर्भिय शासन परिपत्रक क्र.३ अन्वये सुधारित मार्गदर्शक सूचनाही देण्यात आल्या आहेत.

तथापि, शासनाच्या असे निदर्शनास आले आहे की, जलसंपदा प्रकल्पांच्या प्रशासकीय मान्यतेच्या प्रस्तावांना महाराष्ट्र जलसंपत्ती नियमन प्राधिकरणाची पुर्वमान्यता न घेता, प्रशासकीय मान्यता महाराष्ट्र जलसंपत्ती नियमन प्राधिकरणाच्या मान्यतेच्या अधीन राहून प्रदान करण्यात येतात. प्राधिकरणाच्या छाननीत तांत्रिक, पर्यावरणीय, जलशास्त्रीय तसेच आर्थिक तरतुदीमध्ये बदल होऊ शकतात. त्यामुळे प्राधिकरणाच्या मान्यतेच्या अधीन राहून प्रशासकीय मान्यता देणे उचित होणार नाही.

सदर कार्यपध्दत शासनाने पुर्वी निर्धारित केलेल्या कार्यपध्दतीशी विसंगत आहे. त्यामुळे भविष्यात कायदेशीर बाबी उपस्थित होऊ शकतात.

यास्तव, ज्या जलसंपदा प्रकल्पांना महाराष्ट्र जलसंपत्ती नियमन प्राधिकरणाची मान्यता घेणे आवश्यक आहे, अशा जलसंपदा प्रकल्पांना केवळ प्राधिकरणाच्या मान्यतेच्या अधीन राहून प्रशासकीय मान्यता प्रदान करण्यात येऊ नये. मात्र, अशा जलसंपदा प्रकल्पांच्या प्रस्तावांना प्राधिकरणाकडून महाराष्ट्र जलसंपत्ती नियमन प्राधिकरण अधिनियम, २००५ मधील कलम ११ (च) नुसार छाननी करुन मान्यता मिळाल्यानंतरच सदर प्रस्ताव प्रशासकीय मान्यता देण्याची कार्यवाही करण्यासाठी शासनास सादर करावेत, याबाबत दक्षता घेण्यात यावी. उपरोक्त सूचनांचे काटेकोरपणे पालन करण्यात यावे.

प्रस्तुत परिपत्रक मा.मुख्य सचिव यांचे मान्यतेने निर्गमित करण्यात येत आहे.

सदर शासन परिपत्रक महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आले असून त्याचा संकेताक २०२००८११११२५०५२५७२७ असा आहे. हे परिपत्रक डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने,

Rajnish
Ramkishor Shukla

Digitally signed by Rajnish Ramkishor Shukla
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Water Resources Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=d37cbfb080a0bc996a710b3c0aeea737985dac09cb66bbff878f42ad4e77a606, serialNumber=293016b5f13cd03f75c9f34c66d956309c8b3cd5faf07931d817577e6116e436, cn=Rajnish Ramkishor Shukla
Date: 2020.08.11 12:57:21 +05'30'

**( र. रा. शुक्ला )**
**उप सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

१. मा.मुख्य सचिव, महाराष्ट्र राज्य यांचे वरिष्ठ स्वीय सहायक, मंत्रालय, मुंबई.
२. अपर मुख्य सचिव, नियोजन विभाग यांचे स्वीय सहायक, मंत्रालय, मुंबई.
३. अपर मुख्य सचिव (वित्त), वित्त विभाग यांचे स्वीय सहायक, मंत्रालय, मुंबई.
४. प्रधान सचिव (जसं), जलसंपदा विभाग यांचे स्वीय सहायक, मंत्रालय, मुंबई.
५. प्रधान सचिव, महसूल व वन विभाग यांचे स्वीय सहायक, मंत्रालय, मुंबई.
६. प्रधान सचिव, जलसंधारण विभाग यांचे स्वीय सहायक, मंत्रालय, मुंबई.

७. प्रधान सचिव, पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग यांचे स्वीय सहायक, मंत्रालय, मुंबई.
८. सचिव (लाक्षेवि), जलसंपदा विभाग यांचे स्वीय सहायक, मंत्रालय, मुंबई.
९. सचिव, (प्रकल्प समन्वय), जलसंपदा विभाग यांचे स्वीय सहायक, मंत्रालय, मुंबई.
१०. सचिव, महाराष्ट्र जलसंपत्ती नियमन प्राधिकरण, मुंबई.
११. महासंचालक, संकल्पन, प्रशिक्षण, जलविज्ञान, संशोधन व सुरक्षा, नाशिक.
१२. कार्यकारी संचालक, महाराष्ट्र कृष्णा खोरे विकास महामंडळ, पुणे.
१३. कार्यकारी संचालक, विदर्भ पाटबंधारे विकास महामंडळ, नागपूर.
१४. कार्यकारी संचालक, कोकण पाटबंधारे विकास महामंडळ, ठाणे.
१५. कार्यकारी संचालक, तापी पाटबंधारे विकास महामंडळ, जळगांव.
१६. कार्यकारी संचालक, गोदावरी मराठवाडा पाटबंधारे विकास महामंडळ, औरंगाबाद.
१७. मुख्य अभियंता, जलविज्ञान प्रकल्प, नाशिक.
१८. मुख्य अभियंता, महाराष्ट्र अभियांत्रिकी प्रशिक्षण प्रबोधिनी, नाशिक.
१९. मुख्य अभियंता, जलसंपदा विभाग, औरंगाबाद.
२०. मुख्य अभियंता, उत्तर महाराष्ट्र प्रदेश, जलसंपदा विभाग, नाशिक.
२१. मुख्य अभियंता व मुख्य प्रशासक, लाक्षेवि, औरंगाबाद.
२२. मुख्य अभियंता, जलविकास केंद्र, वाल्मी परिसर, औरंगाबाद.
२३. मुख्य अभियंता, जलसंपदा विभाग, नागपूर.
२४. मुख्य अभियंता,गोसीखुर्द प्रकल्प, जलसंपदा विभाग, नागपूर.
२५. मुख्य अभियंता, जलसंपदा विभाग, अमरावती.
२६. मुख्य अभियंता, (विप्र), जलसंपदा अमरावती.
२७. मुख्य अभियंता, तापी पाटबंधारे विकास महामंडळ, जळगांव.
२८. मुख्य अभियंता, जलसंपदा विभाग, पुणे.
२९. मुख्य अभियंता, (विप्र), जलसंपदा विभाग, पुणे.
३०. मुख्य अभियंता, (स्थापत्य), जलविद्युत प्रकल्प, पुणे.
३१. मुख्य अभियंता, यांत्रिकी संघटना नाशिक.
३२. मुख्य अभियंता, कोकण प्रदेश, मुंबई.
३३. सर्व मुख्य अभियंता व सहसचिव, जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई.
३४. उप सचिव (सेवा), जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई.
३५. जसं(आस्था) कार्यासन, संग्रहार्थ.